**राज्यातील दूध व दूध भुकटी निर्यातीस प्रोत्साहनपर अनुदान व दूध उत्पादक शेतकरी यांना खरेदी दरात वाढ मिळण्याकरीता करावयाच्या उपाययोजना.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : लवेसू २०१८/प्र.क्र. ८ /पदुम-८**
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२
तारीख: ३१ जुलै, २०१८

वाचा :- १) शासन समक्रमांकीत शासन निर्णय दिनांक २० जुलै, २०१८.

२) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांचे पत्र क्रमांक आदूवि-९/दुध खरेदी दर/अनुदान / २०१८/ ५३, दिनांक २६.७.२०१८.

३) शासन निर्णय क्रमांक एमएलके-२०१८/प्र.क्र.७३/पदुम-८, दिनांक ६.६.२०१८.

४) केंद्र शासनाची पब्लिक नोटीस २३/२०१५-२०२०, दिनांक १३.७.२०१८

**प्रस्तावना :-**

राज्यातील सहकारी व खाजगी दुग्धउत्पादक व संबंधित लोकप्रतिनिधी यांच्या समवेत दिनांक १९.०७.२०१८ रोजी बैठक घेण्यात येऊन सर्वानुमते घेण्यात आलेले निर्णय विधिमंडळाच्या दोन्ही सभागृहात निवेदनाद्वारे शासनाकडून घोषित करण्यात आले. विधिमंडळात केलेल्या निवेदनांच्या अनुषंगाने सविस्तर प्रस्ताव दिनांक १९.०७.२०१८ रोजीच्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास मंत्रिमंडळाने मान्यता दिल्यानुसार संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णय निर्गमित करण्यात आला. सदर शासन निर्णयाच्या अंमलबजावणीकरीता दिनांक २४.७.२०१८ व दिनांक ३१.७.२०१८ रोजी आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांच्या कार्यालयात राज्यातील सहकारी व खाजगी दुग्ध प्रकल्पधारकांची बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत प्रदीर्घ चर्चा होऊन झालेल्या चर्चेनुसार संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयात सुधारणा करणे आवश्यक ठरल्यामुळे सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

अ) शासन या निर्णयान्वये दुध भुकटी व द्रवरुप दुधाची निर्यात करण्यासाठी सहकारी व खाजगी दूध भूकटी प्रकल्पांना अनुक्रमे रु. ५०/- प्रति किलो आणि रु. ५/- इतके प्रति लिटर प्रोत्साहनपर अनुदान अदा करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून मान्यता देत आहे :-

१) सदर अनुदान दिनांक ३०.६.२०१८ रोजी राज्यात शिल्लक असलेल्या ३०१८३ मे.टन या दूध भुकटीपैकी (SMP/WMP) निर्यात होणाऱ्या दूध भुकटीस देय राहिल. केंद्र शासनाने संदर्भ क्र. ४ अन्वये दूध भुकटीस प्रोत्साहनपर अनुदानाची योजना दिनांक १९.१.२०१९ या कालावधीपर्यंत निश्चित केली असल्याने त्याच धर्तीवर राज्य शासनाकडून वर नमूद केलेल्या दूध भुकटीस प्रोत्साहनपर अनुदान देण्याची योजना दिनांक १९.१.२०१९ पर्यंत राहिल.

२) भारताबाहेर दूध व दूध भूकटी निर्यात केल्याचे सिध्द करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित अनुदान मागणी करणाऱ्या प्रकल्पधारकांची राहिल.

३) अनुदान मंजूरीबाबतचे प्रस्ताव आयुक्त दुग्धव्यवसाय यांनी तपासून स्वयंस्पष्ट अभिप्रायासह सप्रमाण शासनास सादर करणे आवश्यक राहिल.

ब) शासन या निर्णयान्वये राज्यातील उत्पादित होणारे पिशवीबंद दूध वगळून उर्वरित ३.२/८.३ गाय दूध व त्यापेक्षा अधिक गुणप्रतीच्या दुध रुपांतरणास ५/- रुपये अनुदान देण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देत आहे.

**अटी व शर्ती :-**

१. सहकारी/खाजगी दूग्ध संस्थांनी शेतकऱ्यांना खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे दूध दर देणे बंधनकारक राहिल.

| गूणप्रत | प्रति लिटर दर |
|---|---|
| ३.२% फॅट | रुपये २४.१०/- (रु.१९.१० +रु. ५ अनुदान) |
| ३.३% फॅट | रुपये २४.४०/- (रु.१९.४० +रु. ५ अनुदान) |
| ३.४% फॅट | रुपये २४.७०/- (रु.१९.७० +रु. ५ अनुदान) |
| ३.५% फॅट | रुपये २५/- (रु.२० +रु. ५ अनुदान) |

२. राज्यातील सहकारी व खाजगी दूध प्रकिया संस्था यांनी उत्पादित केलेल्या पिशवी बंद दुधासाठी कोणतेही अनुदान देय राहणार नाही.

३.सदर अनुदान दूध पूरवठा करणारी संस्था किंवा रुपांतरण करणारी संस्था यापैकी एका संस्थेस अनुज्ञेय राहिल.

४. या योजनेचा लाभ घेण्यासाठी इच्छूक संस्थांनी संबंधित प्रादेशिक दुग्धविकास अधिकारी यांचेकडे सहभागी होण्यासाठी अर्ज करणे आवश्यक राहिल.

५. या योजनेचा लाभ घेवू इच्छिणा-या संस्थांनी दूध उत्पादक शेतक-यांना वर नमूद केलेल्या तक्त्यानुसार प्रतिलिटर प्रमाणे दि.०१/०८/२०१८ पासून खरेदी दर अदा करित असल्याबाबतचे हमिपत्र/बंधपत्र संबंधीत प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांच्याकडे सादर करणे आवश्यक राहिल.

६. या योजनेचा लाभ घेणाऱ्या प्रत्येक संस्थेने शासनाच्या दि.१३/०७/२०१७ रोजीच्या निदेशानुसार दूध खरेदी देयकाची अदायगी संबंधित शेतक-यांच्या वैयक्तिक बँक खात्यावर रोख विरहीत (ऑनलाइन) पद्धतीने अदा करणे आवश्यक राहिल.

७.ज्या संस्था उपरोक्त योजनेमध्ये सहभागी होतील त्यांनी त्यांचे पिशवीबंद दूध वितरण व त्यांच्याकडे अतिरिक्त प्राप्त होणारे दूध याबाबतचा माहे जुलै,२०१८ अखेरच्या आकडेवारीचा तपशील संबंधीत जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांच्याकडे सादर करणे बंधनकारक राहील.

८.उपरोक्त योजनेमध्ये सहभागी झालेल्या संस्थांनी दूध खरेदी व विक्री बाबतचे अभिलेख दररोज अदयावत ठेवणे व संबंधित जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांना देणे बंधनकारक राहिल.

९.या योजनेमध्ये ज्या संस्था दररोज किमान १० हजार लिटर प्रतिदिन दूधाची हाताळणी करतात अशा संस्थांना या योजनेत सहभागी होण्यासाठी अर्ज करता येईल. प्रतिदिन १० हजार लिटर पेक्षा कमी दूध उत्पादकांनी/संकलकांनी त्यांच्या सोईनुसार सहकारी/खाजगी संस्थेस सदर दूध दयावे व सदर योजनेचा लाभ घ्यावा.

१०. शेतकऱ्यांना/ दूध उत्पादकांना परिच्छेद ब (१) नमूद केलेल्या तक्त्याप्रमाणे दूध दर देणे आवश्यक राहिल. तथापि, दुग्ध व्यवसायात ॲडव्हान्स, पतसंस्थांचे कर्जहप्ते, पशुखाद्यापोटी येणे, स्टोअरमधील इतर साहित्याची येणी इत्यादी करीता कपात करुन दूध बिलाची अदायगी करण्यात येत असल्याने अशाप्रकारे कपात करण्यास मूभा राहिल.

११. योजनेमध्ये सहभागी संस्थांनी अतिरिक्त दूध रूपांतरणासाठी दिल्याबाबतचा अहवाल प्रत्येक १० दिवसांनी जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांचेकडे सादर करणे बंधनकारक राहिल. जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी असे अहवाल तपासून त्याचदिवशी अथवा दुस-या दिवशी प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांचेकडे एकत्रित अहवाल सादर करेल. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी अशा अहवालाची तपासणी करून दर १० दिवसांनी एकत्रित देयकांची मागणी आयुक्त दुग्धव्यवसाय यांच्याकडे सादर करतील. आयुक्त दुग्धव्यवसाय यांच्या मान्यतेनंतरच अनुदानाच्या रकमा अदा केल्या जातील अशी दक्षता घेणे आवश्यक राहिल.

१२. उपरोक्त योजनेची नियमितपणे तपासणी करण्यासाठी आयुक्त, दुग्धव्यवसाय यांनी आवश्यकतेनुसार भरारी पथके नियुक्त करावीत.

१३. या योजनेमध्ये कोणत्याही संस्थेमार्फत अनियमितता झाल्याचे आढळून आल्यास अशा संस्था अनुदान प्राप्तीस अपात्र ठरविल्या जातील, तसेच त्यांना वितरित केलेले अनुदान त्यांच्याकडून व्याजासह वसूल करण्यात येईल. याव्यतिरिक्त, अनियमिततेबाबत कायदेशीर कारवाईही करण्यात येईल.

क) संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयात “क” येथे नमूद करण्यात आलेली बाब कायम आहे.

वरील “अ” आणि “ब” येथे नमूद योजनेवरील अनुदानावरील खर्च हा सन २०१८-१९ करीता शासकीय दूध योजनांच्या मागणी क्र.डी-५, २४०४ दुग्धव्यवसाय विकास याखाली असलेल्या २९ दूध खरेदी या उद्दिष्टाखालील एकूण अनुदानातून आणि दिनांक १९.७.२०१८ रोजीच्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत मान्य करण्यात आलेल्या आकस्मिकता निधीतून मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा. आयुक्त, दुग्धव्यवसाय यांनी सदर योजनेकरीता हिवाळी अधिवेशन, २०१८ पूर्वीचा खर्च भागविण्याकरीता आवश्यक असलेल्या आकस्मिकता निधीचा प्रस्ताव शासनास तात्काळ सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०११२५४७९५०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran V Kurundkar

Digitally signed by Kiran V Kurundkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f89b7a82db2238fb7337a9a9b8e00b9c1a35b509d1f6850ddcc783bdb12090f, cn=Kiran V Kurundkar
Date: 2018.08.01 11:29:21 +05'30'

**( किरण कुरुंदकर )**
सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (पदुम)/मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
११.सचिव, महिला व बाल कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.सचिव (पदुम) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.महालेखापाल, अधिदान व लेखाधिकारी, मुंबई/नागपूर
१५.संचालक, लेखा व अनुज्ञेयता, मुंबई

१६.आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ, गोरेगाव, मुंबई
१८. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी (सर्व)
१९.जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी (सर्व)
२०. निवडनस्ती.